मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल
असलेल्या याचिका क्र. ३८६/२००४,
७२१/२००४ आणि १०९४/२००४ बाबत.
कारागृह सुधारणांबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्र. एमआयएस- २००४/११७/ पीआरएस-२,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १७ फेब्रुवारी २००५.

शासन निर्णय :- कारागृहाच्या विविध समस्यांसंदर्भात सर्वश्री राजेंद्र बिडकर, सुनिल सुरेश शिंदे आणि इंडियन सेंटर फॉर ह्युमन राईटस अँड लॉ यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे क्रिमिनल रिट पिटीशन (पीआयएल) क्रमांक अनुक्रमे ३८६/२००४, ७२१/२००४ व १०९४/२००४ दाखल केलेल्या आहेत. सदर रिट पिटिशनच्या संदर्भात मा.उच्च न्यायालयाने आदेशित केल्याप्रमाणे महा अधिवक्ता, महाराष्ट्र राज्य यांनी संबंधित सर्व विभागाच्या सचिवांच्या अनेक बैठका घेतलेल्या होत्या. या बैठकांमध्ये झालेल्या चर्चेवर आधारित राज्य शासनातर्फे अपर मुख्य सचिव (गृह) यांनी प्रतिज्ञापत्र दाखल केलेले आहे. या प्रतिज्ञापत्रात कारागृहांचे संगणकीकरण, व्हिडीओ कॉन्फरसिंगची योजना अंमलात आणणे, नवीन कारागृहांची निर्मिती करणे, कारागृहातील रिक्त पदे भरणे व कारागृहात प्रसाधनगृहे बांधणे इत्यादी बाबींचा उल्लेख करण्यात आलेला असून त्या पूर्ण होण्याबाबत विहित कालावधी नमूद करण्यात आलेला आहे. वर नमूद केलेल्या बाबी या विहित कालावधीत पूर्ण करणे आवश्यक असल्याने त्यांच्या प्रगतीवर प्रभावी नियंत्रण ठेवण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | अपर मुख्य सचिव (गृह) | - | अध्यक्ष |
| २) | प्रधान सचिव (तुरुंग), गृह विभाग | - | सदस्य |
| ३) | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग | - | सदस्य |
| ४) | सचिव (व्यय), वित्त विभाग | - | सदस्य |
| ५) | सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग | - | सदस्य |
| ६) | सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती) | - | सदस्य |
| ७) | कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे | - | सदस्य |
| ८) | संचालक, आरोग्य सेवा | - | सदस्य |
| ९) | संचालक, वैद्यकीय शिक्षण | - | सदस्य |
| १०) | सह सचिव/उप सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग | - | सदस्य |
| ११) | सह सचिव/उप सचिव,वैद्यकीय शिक्षण विभाग | - | सदस्य |
| १२) | कारागृह उप महानिरीक्षक (मुख्यालय) | - | सदस्य सचिव |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

आगपरदेशी

( आ. ग. परदेशी )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन. ..२

प्रति,

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहाय्यक
अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (तुरुंग), गृह विभाग यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक
सचिव (व्यय), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक
सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग यांचे स्वीय सहाय्यक
सचिव (इमारती), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहाय्यक
संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई
संचालक, वैद्यकीय शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
उप सचिव (तुरुंग), गृह विभाग यांचे स्वीय सहाय्यक
निवड नस्ती (पीआरएस-२).